नागपूर येथील हिवाळी अधिवेशन कालावधीत अधिका-यांकरिता केंद्र / राज्य / स्थानिक संस्था / अन्य उपक्रम मधील विश्रामगृहाच्या भाड्याची प्रतिपूर्ती व अधिकारी कर्मचा-यांना विशेष दैनिक भत्ता मंजूर करणेबाबत .

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१४/प्र. क्र. ५४७ /सेवा-५
३ रा मजला, विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
दिनांक: ०४.०४.२०१५

वाचा —

१) शासन निर्णय क्रमांकः टीआरए-२३६८/१६२१/एक-अठरा, दि.२७ ऑक्टोबर, १९७०
२) शासन निर्णय क्रमांकः टीआरए-१०७७/१५६-सी/सेवा-५, दि.११ ऑगस्ट, १९७७
३) शासन निर्णय क्रमांकः प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दि.३ मार्च, २०१०
४) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१०/प्र.क्र.३१/सेवा-५, दि.२३ डिसेंबर, २०११
५) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१२/प्र.क्र.३१/सेवा-५, दि.२१ डिसेंबर, २०१२
६) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१३/प्र.क्र.१/सेवा-५, दि.१९ जानेवारी, २०१३
७) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१४/प्र.क्र.५४७/सेवा-५, दि.२२ डिसेंबर, २०१४

प्रस्तावना —

विधानमंडळाच्या नागपूर येथे होणाऱ्या हिवाळी अधिवेशनादरम्यान अधिकारी/कर्मचारी यांना देय असलेला दैनिक भत्ता अपूरा पडत असल्याबाबतची बाब बऱ्याच शिबीर कार्यालयातील तसेच मंत्री कार्यालयातील कर्मचारी / अधिकाऱ्यांनी निदर्शनास आणली आहे. या सर्व बाबींचा विचार करुन शासनाने दैनिक भत्त्याचे दर उपरोक्त क्रमांक ७ येथील दि.२२.१२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये सुधारीत करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर अपलोड करण्याची तसेच त्यात अंशत: सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

या सर्व बाबींचा विचार करुन शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय—**

उपरोक्त अनुक्रमांक ७ येथील दि.२२.१२.२०१४ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

नागपूर येथील हिवाळी अधिवेशन कालावधीत जे अधिकारी, कर्मचारी केंद्र/राज्य/स्थानिक संस्था/अन्य उपक्रम यांचे विश्रामगृहात राहतील त्यांच्या विश्रामगृहाच्या भाड्याची प्रतीपूर्ती संबंधीत विभागाने त्यांच्या कार्यालयीन खर्चातून करावी. ज्या अधिका-यांनी भाड्याची रक्कम रोखीने भरली असेल तर त्याची प्रतिपुर्ती विभागाने कार्यालयीन खर्चातून करावी.

नागपूर अधिवेशनाकरिता आलेल्या अधिकारी / कर्मचारी यांना देय असलेल्या, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१२/प्र.क्र.३१/सेवा-५, दि.२१ डिसेंबर, २०१२ व शासन शुद्धीपत्रक क्र.संकीर्ण-२०१३/प्र.क्र.१/सेवा-५, दि.१९ जानेवारी, २०१३ मधील तक्ता अन्वये अनुज्ञेय दैनिक भत्त्यात खालीलप्रमाणे वाढ करण्यात येत आहे. त्यानुसार विधी मंडळाच्या हिवाळी अधिवेशनाच्या कामासाठी नागपूर येथे जाणाऱ्या सर्व अधिकारी/कर्मचाऱ्यांना शिबीर कार्यालय उघडण्यात येणाऱ्या दिनांकापासून ते कार्यालय बंद होईपर्यंतच्या कालावधीत सर्वसाधारण दैनिक भत्त्याच्या तुलनेत विशेष दैनिक भत्त्याचे दर खालीलप्रमाणे देय राहतील.

| अ.क्र. | वेतन मर्यादा (ग्रेड-पे नुसार) | सर्वसाधारणपणे विशेष दैनिक भत्ता (शासन निर्णय २१ डिसेंबर, २०१२ व शासन शुद्धीपत्रक १९ जानेवारी, २०१३ नुसार) | वाढीव विशेष दैनिक भत्ता |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | रु.८९००/- व त्याहून अधिक | रु. ३७५/- | रु. ७२५/- |
| २ | रु.६६००/- ते रु. ८८९९/- | रु.३५०/- | रु.६७५/- |
| ३ | रु.५४००/- ते रु. ६५९९ /- | रु.३५०/- | रु.६५०/- |
| ४ | रु.४४००/- ते ५३९९/- | रु.३२५/- | रु.६२५/- |
| ५ | रु.४२००/- ते ४३००/- | रु.३००/- | रु.५७५/- |
| ६ | रु.४२००/- पेक्षा कमी | रु.२७५/- | रु.५२५/- |

नागपूर अधिवेशन कालावधीत संबंधित अधिकारी /कर्मचारी यांना राहण्याची (वास्तव्याची) व भोजनाची सोय शासनाकडून झाल्यास त्यांना दैनिक भत्ता (Daily Allowance) पुढील प्रमाणे देय होईल :-

| | |
|---|---|
| फक्त राहण्याची (वास्तव्याची) व्यवस्था झाली असेल तर | अनुज्ञेय दराच्या ¾ दराने |
| फक्त भोजनाची व्यवस्था झाली असेल तर | अनुज्ञेय दराच्या ½ दराने |
| जेव्हा राहण्याची (वास्तव्याची) व भोजनाची व्यवस्था झाल्यास | अनुज्ञेय दराच्या ¼ दराने |

या शासन निर्णयाच्या अनुषंगाने संबंधित कर्मचारी / अधिकारी यांना शासन निर्णय वित्त विभाग दि.२७.१०.१९७० नुसार संपूर्ण दराचा दैनिक भत्ता अनुज्ञेय ठरणार नाही.

सदर आदेश डिसेंबर २०१४ च्या अधिवेशनापासून लागू होतील व ते नागपूर अधिवेशन कालावधीसाठीच अनुज्ञेय राहतील इतर वेळी शासन निर्णय दि.३ मार्च, २०१० मधील आदेश लागू राहतील. तसेच सदर दैनिक भत्ता देतांना अनुक्रमांक १ व २ येथील दि.२७.१०.१९७० व दि.११.०८.१९७७ च्या शासन निर्णयातील अन्य तरतूदीही विचारात घेणे आवश्यक ठरेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०४१३१०१२४१०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Devidasrao Londhe

Digitally signed by Shrikant Devidasrao Londhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shrikant Devidasrao Londhe
Date: 2015.04.04 13:20:23 +05'30'

**(श्री. दे. लोंढे)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,

२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,

३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

५. राज्यपालांचे सचिव,

६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

७. मंत्री (वित्त) / राज्यमंत्री (वित्त) यांचे स्वीय सहायक,

८. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,

९. सर्व मंत्रालयीन विभाग,

१०.सर्व विभागीय आयुक्त,

११.मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,

१२.प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,

१३.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
१४.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१५.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१६.प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१७.सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नार्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
१८. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई,
१९. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
२०.उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/ नागपूर/औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती.
२१. जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
२२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२३. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२५. वित्त विभागातील सर्व कार्यासने,
२६. निवडनस्ती, वित्त विभाग/सेवा-५.